केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांसाठी सर्वसाधारण योजनेंतर्गत सन २०१६-१७ मधील केंद्र हिश्श्यापोटी रू.४८९.५४ लक्ष (पहिला हफ्ता) अनुदान वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः निधीवि-२६१७/प्र.क्र.६३/२०१७/आ-७**

१० वा मजला , गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २९ मार्च, २०१७

**वाचा :-**

१) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र No.४-१०/२०१६-१७/NVBDCP/Accts/GIA/States, दिनांक २१ डिसेंबर, २०१६.

२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/ कें.हि./११२३६९-३७५/२०१६-१७, दिनांक ४ फेब्रुवारी, २०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय किटकजन्य कार्यक्रमांतर्गत डासांमार्फत प्रसारीत होणाऱ्या हिवताप, हत्तीरोग, डेंगी ताप, जॅपनिज एन्सेफेलिटिस ( मेंदूज्वर), चिकनगुनिया, सॅडफ्लाय मार्फत प्रसरीत होणारा चंडीपूरा एन्सेफेलिटिस तसेच, पिसांमार्फत प्रसारीत होणारा प्लेग या रोगांच्या नियंत्रणासाठी उपाय योजना राबविण्यात येतात. राज्यात राष्ट्रीय हिवताप नियंत्रण कार्यक्रम सन १९५६ पासून व राष्ट्रीय हत्तीरोग निंयंत्रण कार्यक्रम १९५७ पासून राबविण्यात येत आहे. सन २००४ पासून उपरोक्त सर्व कार्यक्रमांचे एकत्रिकरण करून राष्ट्रीय किटकजन्य कार्यक्रम राबविण्यात येत आहे. या कार्यक्रमाचे उद्दिष्ट्ये पुढीलप्रमाणे : अ) हिवताप डेंगीताप, मेंदूज्वर मुळे होणारे मृत्यूचे प्रमाण सन २०१२ पर्यंत ५० टक्के कमी करणे व रूग्णसंख्या नियंत्रणात ठेवणे. ब) सन २०१५ पर्यंत बाह्यलक्षणे युक्त हत्तीरोगाचे निर्मूलन करणे.

## शासन निर्णय :-

राज्यामध्ये राष्ट्रीय किटकजन्य कार्यक्रमांतर्गत या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सर्वसाधारण योजनेंतर्गत (General) लाभार्थ्यांकरिता सन २०१६-१७ साठी ६०% केंद्र हिश्श्यापोटी रु.४८९.५४ लक्ष (रुपये चार कोटी एकोणनव्वद लाख चोपन्न हजार फक्त) इतकी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००- इतर खर्च; पंचवार्षिक योजनांतर्गत योजना; (०१) (२३) राष्ट्रीय किटकजन्य कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा ६०%) (२२१०F२०१) - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ७९/अर्थोपाय, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१७ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१९१९२५४२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.29 12:15:48 +05'30'

**( सं. रा. मोरे )**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. सहायक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१४.निवडनस्ती ( आरोग्य -७) .